मा.महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाच्या आदेशास अनुसरून ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज. जी. समूह रूग्णालय, मुंबई येथे शवविच्छेदन व्हिसेरांची तपासणी, कामाची विभागणी व इतर बाबींबाबत उच्चस्तरीय समिती गठित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः माहआ-२०१९/२४७/प्र.क्र.१२४/प्रशा-२**

**नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.**

**दिनांक: २८ नोव्हेंबर, २०१९.**

**प्रस्तावना:-**

ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज. जी. समूह रूग्णालय, मुंबई येथे शवविच्छेदन व्हिसेरा अहवालातील दिरंगाईच्या संदर्भात "व्हिसेरा अहवालात दिरंगाई" (सहा वर्षांतील तीन हजार अहवाल प्रलंबित, पोलीस तपास रखडले) (जे.जे रूग्णालयातील अवस्था) या मथळ्याखाली "दैनिक महाराष्ट्र टाईम्स" या वृत्तपत्रातील दि.२१.०१.२०१९ रोजी प्रसिद्ध झालेल्या बातमीच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग येथे सु-मोटो केस क्र.MAS/Suo-Motu-२०/१३/१६/२०१९ दाखल करण्यात आली आहे. सदर प्रकरणी ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज. जी. समूह रूग्णालय, मुंबई येथे शवविच्छेदन व्हिसेरांची तपासणी, कामाची विभागणी व इतर बाबींबाबत गृह विभाग,सीपी कार्यालयातील जबाबदार वरिष्ठ अधिकारी, अधिष्ठाता,जे.जे.समूह रूग्णालय,मुंबई, प्राध्यापक व विभाग प्रमुख,पॅथॉलॉजी,ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज.जी.समूह रूग्णालय,मुंबई या सदस्यांचा समावेश असलेली तज्ञ समिती गठीत करण्याचे आदेश मा.मुख्य सचिव यांना दि.०३.०९.२०१९ रोजीच्या आदेशान्वये मा.आयोगाकडून देण्यात आले आहेत.

२. मा.महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाच्या दि.०३.०९.२०१९ रोजीच्या उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज. जी. समूह रूग्णालय, मुंबई या संस्थेतील प्रलंबित व्हिसेरांच्या तपासणीबाबत रूग्णालयावर पडणारा अतिरिक्त ताण व शवविच्छेदन व्हिसेरांची तातडीने निपटारा होण्याची गरज विचारात घेऊन, उक्त सदस्यांव्यतिरिक्त सार्वजनिक आरोग्य विभाग, गृह विभाग, नगर विकास विभाग, विधि व न्याय विभाग, बृहन्मुंबई महानगरपालिका प्रतिनिधी,

विभागप्रमुख LTMC - सायन मेडीकल कॉलेज, पोलिस सर्जन यांचाही समावेश करून सदर प्रकरणी उच्चस्तरीय समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज. जी. समूह रूग्णालय, मुंबई येथे शवविच्छेदन व्हिसेरांची तपासणी, कामाची विभागणी व इतर बाबींबाबत मा.महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोग (सु-मोटो केस क्र.MAS/Suo-Motu-२०/१३/१६/२०१९) या प्रकरणी मा.आयोगाच्या दि.०३.०९.२०१९ रोजीच्या आदेशास अनुसरून खालीलप्रमाणे उच्चस्तरीय समिती गठित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १. | संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई | अध्यक्ष |
| २. | संचालक, सार्वजनिक आरोग्य, मुंबई | सदस्य |
| ३. | सह सचिव / उप सचिव, गृह विभाग | सदस्य |
| ४. | सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ५. | सह सचिव / उप सचिव, नगर विकास विभाग | सदस्य |
| ६. | सह सचिव / उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग | सदस्य |
| ७. | सह सचिव / उप सचिव, विधि व न्याय विभाग | सदस्य |
| ८. | पोलीस आयुक्तालय, प्रतिनिधी | सदस्य |
| ९. | बृहन्मुंबई महानगरपालिका (आरोग्य) प्रतिनिधी | सदस्य |
| १०. | अधिष्ठाता, ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई | सदस्य |
| ११. | डॉ.राजेश ढेरे, प्राध्यापक व विभाग प्रमुख, फॉरेन्सिक, LTMC (सायन मेडीकल कॉलेज), मुंबई | सदस्य |
| १२. | डॉ.एस.एम.पाटील, पोलीस सर्जन, नागपाडा, मुंबई | सदस्य |
| १३. | ॲड.सम्राट ठक्कर, एमीकस क्युरी (Amicus Curie), MSHRC, मुंबई | सदस्य |
| १४. | डॉ.संजय बिजवे, प्राध्यापक व विभाग प्रमुख पॅथॉलॉजी, ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. जे. जे. रूग्णालयातील पॅथॉलॉजी विभागाच्या कामकाजात सुरळितपणा येण्यासाठी सदर प्रकरणी अमीकस क्युरी (Amicus Curie) यांनी केलेल्या शिफारशींचे परीक्षण व विश्लेषण करून त्याबाबतची अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने उपरोक्त समिती आपला अहवाल सादर करील.

३. जिल्हा रूग्णालयामध्ये शवविच्छेदन व्हिसेरांची तपासणी व विश्लेषण करता येईल का याबाबतची व्यवहार्यता उक्त तज्ञ समिती तपासेल, जेणेकरून हिस्टोपॅथॉलॉजिकल अहवाल सादर करण्याची गती वाढेल व कामाचा व्याप कमी होऊन व्हिसेरा नमुन्याची तपासणी करण्यासाठीचा विलंब टाळता येईल.

४. मुंबई व ठाणे शहरातील शवविच्छेदन व्हिसेरा तपासणी नमुन्यांची समान विभागणी ही मुंबई व ठाणे मधील शासकीय आणि निमशासकीय वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये व मुंबई व ठाणे विभागासाठी पोलिस स्टेशनप्रमाणे करण्याबाबत विचार करावा. तसेच मुंबई व ठाणे विभाग वगळता महाराष्ट्रातील इतर विभागांसाठी व्हिसेरा तपासणी नमुन्यांची विभागणी ही तालुकास्तरावर करण्याच्या अनुषंगाने व्यवहार्यता तपासावी.

५. मा.महाराष्ट्र राज्य मानवी हक्क आयोगाच्या दि.०३.०९.२०१९ रोजीच्या आदेशाची पूर्तता दि.२६.०९.२०१९ पासून तीन महिन्यात करावयाची आहे. याबाबतचा आवश्यक अहवाल दि.१३.१२.२०१९ पूर्वी मा.आयोगास सादर करावयाचा आहे. मा.आयोगाच्या आदेशाच्या अनुषंगाने सदर समितीने तात्काळ बैठक घेऊन सविस्तर अहवाल डिसेंबर, २०१९ च्या पहिल्या आठवड्यात शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२८१७३०५२४७१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb1adbd5d5d31cf6d91c86149c955a6822b4fea3e4ec334c18e2c6f96cc5301b, cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2019.11.29 12:07:02 +05'30'

( प्रकाश सुरवसे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई
२) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

४) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
७) पोलिस आयुक्त, मुंबई
८) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
९) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
१०) संचालक, सार्वजनिक आरोग्य, मुंबई
११) उप सचिव (प्रशासन), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
१२) अधिष्ठाता, ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई
१३) डॉ.राजेश ढेरे, प्राध्यापक व विभाग प्रमुख, फॉरेन्सिक, LTMC (सायन मेडीकल कॉलेज), मुंबई
१४) डॉ.एस.एम.पाटील, पोलीस सर्जन, नागपाडा, मुंबई
१५) ॲड.सम्राट ठक्कर, एमीकस क्युरी (Amicus Curie), MSHRC, मुंबई
१६) डॉ.संजय बिजवे, प्राध्यापक व विभाग प्रमुख पॅथॉलॉजी, ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई
१७) निवडनस्ती (प्रशासन-२)